राज्य योजना सन २०२३-२४ अंतर्गत ग्रामपरिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) योजने अंतर्गत अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०२४/प्र.क्र. ८/फ-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३१ मार्च, २०२४.

**संदर्भ** :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ व दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/यो/इए/संवव्य/प्र.क्र.०५/२३-२४/१५०, दि.०९.०२.२०२४, दि.१३.०२.२०२४ व दि.२२.०२.२०२४.
३) शासन निर्णय क्रमांक एफडीएम-२०२४/प्र.क्र. ८/फ-२, दि.२७.०२.२०२४.

**प्रस्तावना** :-

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये सन २०२३-२४ करिता संत तुकाराम वनग्राम योजने अंतर्गत राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय पुरस्कार व त्याच्या आयोजनासाठी रु.७५.०० लक्ष आणि आणि महाराष्ट्र वनभूषण पुरस्कारासाठी रु.२०.०० लक्ष असे पुरस्कार/ बक्षीस प्रदान करण्यासाठी एकूण रु.९५.०० लक्ष चे प्रस्ताव शासनास सादर केले होते. त्याअनुषंगाने अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्सवर) उपलब्ध निधीच्या मार्यादेत संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये ०५- बक्षिसे या सविस्तर शिर्षांतर्गत रु.२२.२० लक्ष (महाराष्ट्र वनभूषण पुरस्कारासाठी रु.२०.०० लक्ष व संत तुकाराम वनग्राम योजने अंतर्गत राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय पुरस्कार व त्याच्या आयोजनासाठी रु.२.२० लक्ष) उपलब्ध करुन देण्यात आले आहेत. तथापि, संत तुकाराम वनग्राम योजने अंतर्गत राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय पुरस्कार व त्याच्या आयोजनासाठी अद्यापही रु.७२.८० लक्ष निधी देणे बाकी आहेत.

राज्य योजनेअंतर्गत "ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम " (२४०६ १५२१) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता सुधारीत अंदाजानुसार एकूण रु.४३७.६५ लक्ष इतका निधी उपलब्ध करण्यात आलेला आहे. त्यापैकी ०५- बक्षिसे या सविस्तर शिर्षांतर्गत रु.३१.१० लक्ष व ५०-इतर खर्च या सविस्तर शिर्षांतर्गत रु.१३८.०५ लक्ष इतका निधी सुधारीत अंदाजानुसार मंजूर आहे. तथापि सद्यस्थितीत आधी वितरीत करण्यात आलेली रक्कम वजा जाता अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्सवर) २४०६ १५२१ या योजनेकरिता ०५- बक्षिसे या सविस्तर शिर्षांतर्गत रु.८.९ लक्ष निधी हा आणि ५०-इतर खर्च या सविस्तर शिर्षांतर्गत रु.२६.९ लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध आहे.

त्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी अनुदानाची मागणी केल्यानुसार तथापि सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत वित्त विभागाने वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीनुसार आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत ०५- बक्षिसे या सविस्तर शिर्षांतर्गत रु.४.४६ लक्ष निधी तसेच रु.२६.९० लक्ष निधी हा ५०- इतर खर्च मधून शिल्लक अनुदानातून पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देऊन असा एकूण रु.३१.३६ लक्ष निधी संत तुकाराम वनग्राम योजने अंतर्गत राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय पुरस्कार व त्याच्या आयोजनासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी प्रस्तावित केल्यानुसार व सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत वित्त विभागाने वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीनुसार आदिवासी विकास कार्यक्रम **(२४०६ १५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत ०५- बक्षिसे या सविस्तर शिर्षांतर्गत रु.४.४६ लक्ष निधी तसेच रु.२६.९० लक्ष निधी हा ५०- इतर खर्च मधून शिल्लक अनुदानातून पुनर्वितरणाने उपलब्ध करुन असा एकूण रु.३१.३६ लक्ष निधी संत तुकाराम वनग्राम योजने अंतर्गत राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय पुरस्कार व त्याच्या आयोजनासाठी वितरीत करुन खर्च करण्यास** खालील नमुद अटी व शर्तीचे अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे. सदरहू शासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी.

२) सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

३) सदर योजनेकरिता वितरित केलेला निधी खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४) त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

५) सदर प्रस्तावांतर्गत करावयाच्या कामाचा खर्च मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीव, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (बिगर आदिवासी उपयोजना) १०१(११) वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, (११)(१०) ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम

(संयुक्त वनव्यवस्थापन) कार्यक्रम (२४०६ १५२१) राज्य योजनांतर्गत योजना या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ **क्र.१३५१/नियोजन, दि.२०.०३.२०२४** आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ **क्र.१५५/२०२४ व्यय-१०, दि.२२.०३.२०२४** अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३११३०५१९५५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

PRADNYA PRAMOD MULE

Digitally signed by PRADNYA PRAMOD MULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=2a213e61027be02368b2655e124509e72fb3a334568af813992b1c4e97e13f87, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CF29F03589BBC02EDE91053BB5AEF9A7F21612D23D0578DDB9118FC7E32141805, cn=PRADNYA PRAMOD MULE
Date: 2024.03.31 13:15:16 +05'30'

**( प्रज्ञा मुळे )**
**कक्ष अधिकारी महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व).
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व).
६) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नाशिक व नागपूर आणि वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर.
७) उप वनसंरक्षक पश्चिम भाग नाशिक, भंडारा व वर्धा.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर, नाशिक, भंडारा व वर्धा.
१२) प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१४) निवडनस्ती, फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.